

शासकीय अधिकारी/कर्मचारी यांना संगणकाचे प्रशिक्षण घेण्याबाबत मान्यता दिलेल्या अभ्यासक्रमासाठी देय असलेल्या प्रशिक्षणशुल्काच्या रकमेत सुधारणा करण्याबाबत.

# महाराष्ट्र शासन
## सामान्य प्रशासन विभाग

शासन परिपत्रक :- क्रमांक-सीओएम १०९८/प्र.क्र. १३४/९८/३९,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक :- २० नोव्हेंबर, १९९९

वाचा :- (१) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांकः- सीओएम १०९८/प्र.क्र.१३४/९८/३९, दिनांक २४ मार्च,१९९८.
(२) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक :- सीओएम १०९८/प्र.क्र.१३४/९८/३९,दिनांक ५ नोव्हेंबर,१९९८
(३) शासन निर्णय,सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक :-सीओएम १०९८/प्र.क्र.१३४/९८/३९, दिनांक ३ मार्च,१९९९.

१.० प्रस्तावना :-

१.१ शासकीय अधिकारी/कर्मचारी यांना संगणकाचे प्रशिक्षण घेण्यासाठी या शासन निर्णयासोबतच्या परिशिष्ट १ मधील स्तंभ २ मध्ये दर्शविलेल्या संस्थांच्या स्तंभ ४ मधील पाठयक्रमांना उपरोक्त संदर्भाधित क्रमांक ३ येथील शासन निर्णय दिनांक ३ मार्च,१९९९ अन्वये मान्यता देण्यात आली आहे. सदर शासन निर्णयामधील स्तंभ ५ मध्ये पाठयक्रमांचा स्तर निश्चित करण्यात आला आहे व स्तंभ ६ मध्ये सदर पाठयक्रमासाठी जी प्रोत्साहनात्मक रक्कम अधिकारी/ कर्मचारी यांना देय होईल त्याचा उल्लेख करण्यात आला आहे.

१.२ शासन निर्णय, दिनांक २४ मार्च,१९९८ अन्वये शासकीय अधिकारी/कर्मचारी यांना प्रशिक्षण देण्यासाठी जो अभ्यासक्रम सुयोग्य होता त्याची निवड केली होती. त्यावेळी या अभ्यासक्रमाचे प्रशिक्षण घेण्यासाठी जे शुल्क आकारले होते ते स्तर १ साठी रु.५०००/- असे होते. कर्मचा-यांनी रु.५०००/- इतके शुल्क भरुन अभ्यासक्रमाचे प्रशिक्षण घ्यावे व अभ्यासक्रम उत्तीर्ण झाल्यावर शुल्क रकमेची शासनाने प्रतिपूर्ती करावी व रु.२५००/- इतके प्रोत्साहनात्मक अनुदान द्यावे असे या निर्णयाचे स्वरुप आहे. शासकीय कामकाजाचे संगणकीकरण करीत असताना सर्व स्तरावरील अधिकारी/ कर्मचारी हे प्रशिक्षित असणे आवश्यक आहे. प्रशिक्षित अधिकारी/कर्मचारी नसल्यास शासन संगणकीकरणासाठी जी गुंतवणूक करणार आहे त्या निधीचा शासनास व जनतेस कोणताही उत्पादक असा फायदा मिळणार नाही हे स्पष्ट आहे. अधिकारी/कर्मचारी हे संगणक वापरामध्ये प्रशिक्षित झाल्यावरच संगणकांचा असा उत्पादक वापर होवू शकेल. शासनाच्या या योजनेस सर्व स्तरावरील अधिकारी व कर्मचारी यांनी अतिशय उत्साहवर्धक असा प्रतिसाद दिला. शासकीय अधिकारी/कर्मचारी यांनी मोठया प्रमाणावर प्रशिक्षण घ्यावयास सुरवात केली आहे. अनेक कार्यालयातील अधिकारी व कर्मचारी प्रशिक्षणासाठी जावू लागल्यावर प्रशिक्षण देणा-या संस्थांमध्ये बरीचशी स्पर्धा निर्माण झाली असून त्यामुळे प्रशिक्षणासाठी द्याव्या लागणा-या शुल्कातही संस्थांनी प्रोत्साहनात्मक सुट देण्यास तयारी दर्शविली आहे. प्रशिक्षण क्षेत्रात जी स्पर्धा निर्माण झाली आहे त्या स्पर्धेचा शासनास सकारात्मक फायदा होणार आहे. तसेच शासकीय निधीचा वापर स्पर्धात्मक परिस्थितीतून निर्माण होणा-या दरांच्या अनुषंगानेच होणे संयुक्तिक आहे. हे लक्षात घेवून शासनाने याबाबतचा पुनर्विचार केला व प्रशिक्षण क्षेत्रात कार्यरत असलेल्या संस्थांशी सविस्तर विचार विनिमय केला. असा विचार विनिमय केल्यावर शासनाने पुढीलप्रमाणे निर्णय घेतला आहे :-



Ds (Estt)

२.० शासन निर्णय :-

२.१ दिनांक २४ मार्च,१९९८ च्या शासन निर्णयात नमुद केल्यानुसार या प्रशिक्षणावरील खर्च हा कार्यालयीन खर्च या लेखाशिर्षाखाली करावयाचा आहे. या लेखाशिर्षाखाली योग्य ती आर्थिक तरतुद करुन घेण्याची जबाबदारी विभाग प्रमुख व कार्यालय प्रमुख यांची असेल.

२.२ जे अधिकारी/कर्मचारी निवडण्यांत आलेले आहेत त्यांना प्रशिक्षणासाठी कार्यालयीन वेळेतून दोन तासांची सूट द्यावी.

२.३ ज्या संस्थांचे पाठयक्रम मान्य करण्यांत आलेले आहेत त्यांच्या परीक्षेसाठी जे शुल्क देय आहे त्यामध्ये तसेच प्रोत्साहनात्मक रक्कमेमध्ये बदल करण्याचे शासनाने ठरविलेले आहे. या अनुषंगाने मान्य पाठयक्रमासाठी जे शुल्क व प्रोत्साहनात्मक रक्कम देय असेल ते सोबतच्या परिशिष्ट २ मधील स्तंभ ६ मध्ये दर्शविण्यांत आलेले आहे.

२.४ सोबत जे मान्य अभ्यासक्रम आहेत त्याचा किमान कालावधीचा आणि इतर तपशील परिशिष्ट ३ मध्ये देण्यांत आलेला आहे.

२.५ सदर शासन निर्णयातील तरतुदीनुसार सर्व महामंडळे, स्थानिक स्वराज्य संस्था व शासनाच्या अधिनस्त व शासनास संलग्न अशा सर्व संस्थांना लागू रहातील. त्यांनी या बाबीवरील सर्व खर्च स्वतःच्या निधीतूनच करावयाचा आहे.

२.६ हा शासन निर्णय जे मान्यताप्राप्त अभ्यासक्रम डिसेंबर १९९९ पासून सुरु होतील त्या प्रशिक्षणासाठी लागू होईल. डिसेंबर १९९९ पर्यंत पुर्वीपासून चालू असलेल्या अभ्यासक्रमांसाठी दि.३.३.१९९९ च्या शासन निर्णयाच्या अनुषंगानेच सर्व [illegible]साठी एकूण रु.७५००/- इतकी प्रोत्साहनात्मक रक्कम देय असेल. तसेच दिनांक ३.३.१९९९ च्या शासन निर्णयातील ज्या तरतुदी या निर्णयातील तरतुदींशी विसंगत नसतील, त्यादेखिल यापुढे अंमलात राहतील.

वरील आदेश वित्त विभागाच्या सहमतीने व त्यांचा अनौपचारीक संदर्भ क्रमांक प्र.क्र. १५९९/९९/व्यय - ४ दिनांक १५/११/१९९९ नुसार निर्गमित करण्यांत येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

( राधेश्याम मोपलवार )
उप सचिव , महाराष्ट्र शासन

प्रति,

१) राज्यपालांचे सचिव,
२) मुख्यमंत्री यांचे सचिव,
३) उपमुख्यमंत्री यांचे सचिव,
४) सर्व मंत्री यांचे खाजगी सचिव,
५) सर्व राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव,
६) प्रबंधक, उच्च न्यायालय, मूळ शाखा, मुंबई,
७) प्रबंधक, उच्च न्यायालय, अपिल शाखा, मुंबई,
८) प्रबंधक, लोकआयुक्त व उप लोकआयुक्त, मुंबई,
९) सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई,
१०) सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय (विधानसभा), मुंबई,
११) सचिव,महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय (विधानपरिषद), मुंबई,
१२) महालेखापाल-१ (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, मुंबई,
१३) महालेखापाल-२ (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, नागपूर,
१४) महालेखापाल-१ (लेखा परीक्षा), महाराष्ट्र, मुंबई,
१५) महालेखापाल-२ (लेखा परीक्षा), महाराष्ट्र, नागपूर
१६) शासनाचे सर्व अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव,

१७) सर्व मंत्रालयीन प्रशासकीय विभाग,
१८) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई, लेखाकोष भवन, वान्द्रे (पूर्व), मुंबई,
१९) निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई,
२०) सर्व विभागीय आयुक्त,
२१) सर्व जिल्हापरिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी,
२२) सर्व जिल्हाकोषागार कार्यालये,
२३) मंत्रालयीन विभागांच्या नियंत्रणाखालील सर्व विभाग प्रमुख व कार्यालय प्रमुख,
२४) सामान्य प्रशासन विभागातील सर्व कार्यासने,
२५) निवडनस्ती ( २ प्रती).

शासन निर्णय क्रमांक :- सीआंतम १०९८/प्र.क्र.१३४/९८/३९, दिनांक २० नोव्हेंबर,१९९९ चे परिशिष्ट -१

| अ.क्र | संस्थेचे नाव | पत्ता | पाठ्यक्रम | स्तर | प्रोत्साहनात्मक रक्कम |
|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ |
| १ | डोईएसीसी सोसायटी | इलेक्ट्रॉनिक्स निकेतन,<br>६ सीजीओ कॉम्प्लेक्स,<br>नवी दिल्ली -११० ००३,<br>दूरध्वनी क्रमांक (०११)<br>४३६३३३०/३१/३२<br>फॅक्स क्रमांक -४३६३३३५ | कोर्स ऑन कॉम्प्युटर कन्सेप्ट<br>ओ लेव्हल कोर्स<br>ए लेव्हल कोर्स | एक<br>एक<br>दोन | रु. ७,५००/-<br>रु. ७,५००/-<br>रु.१०,०००/- |
| २ | सी -डॅक | पुणे युनिव्हर्सिटी कॅंपस,<br>गणेश खिंड, बाणेर रोड,पुणे ७<br>दूरध्वनि क्रमांक (०२०)<br>३७००३४<br>दूरध्वनी क्रमांक - (०२०)<br>५६७ ६६८२,५६५ १६८३/८५<br>फॅक्स क्रमांक - ५६५ ७५५१<br>५६७ ९२६४ | डिप्लोमा इन इन्फरमेशन टेक्नॉलॉजी<br>अॅडव्हान्स डिप्लोमा इन इन्फरमेशन टेक्नॉलॉजी | एक<br>दोन | रु. ७,५००/-<br>रु. १०,०००/- |
| ३ | यशवंतराव चव्हाण महाराष्ट्र मुक्त विद्यापिठ, नाशिक | ज्ञानगंगोत्री,<br>गंगापूर धरणाजवळ,<br>नाशिक ४२२ ००५,<br>दूरध्वनी क्रमांक - (०२५३)<br>३५१७२४/२५<br>३५४१२७/२८<br>फॅक्स क्रमांक -३५१७२६ | सर्टीफिकेट इन ऑफीस ऑटोमेशन<br>डिप्लोमा इन ऑफीस ऑटोमेशन | एक<br>दोन | रु. ७,५००/-<br>रु. १०,०००/- |
| ४ | सेन्टर फॉर इलेक्ट्रॉनिक्स डिझाईन अॅन्ड टेक्नॉलॉजी ऑफ इंडिया, औरंगाबाद, (सीईडिटिआय) | सीईडीटीआय कॉम्प्लेक्स<br>विश्वविद्यालय परिसर,<br>औरंगाबाद-४३१ ००४.<br>दूरध्वनी क्रमांक (०२४०)<br>३३२६०९<br>फॅक्स क्रमांक -३३१०४८ | सर्टीफिकेट इन इन्फरमेशन टेक्नॉलॉजी | एक | रु. ७,५०० |
| ५ | तंत्रशिक्षण परिक्षा मंडळ, महाराष्ट्र राज्य, मुंबई | शासकीय तंत्र निकेतन इमारत,<br>[illegible], ४९,खेरवाडी,<br>अलीयावर जंग मार्ग,<br>वांद्रे (पूर्व), मुंबई-४०० ०५१.<br>दूरध्वनी क्रमांक (०२२)<br>६५१३३७९/ ६५१३९८० | अॅडव्हान्स डिप्लोमा इन कॉम्प्युटर सॉफ्टवेअर सीस्टीम अॅनॅलिसीस अॅन्ड अॅप्लीकेशन्स (ओडीसीएसएसए) | एक | रु. ७,५००/- |

एस-922(अ)(3000-12-99)-3

| अ.क्र | संस्थेचे नांव | पत्ता | अभ्यासक्रम | स्तर | प्रशिक्षण उत्तीर्ण झाल्यावर देय रक्कम |
|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ |
| १ | डीओईएसीसी सोसायटी | इलेक्ट्रॉनिक्स निकेतन, ६ सीजीओ कॉम्प्लेक्स, नवी दिल्ली -११० ००३, दूरध्वनी क्रमांक (०११) ४३६३३३०/३१/३२ फॅक्स क्रमांक -४३६३३३५ | कोर्स ऑन कॉम्प्युटर कन्सेप्ट | एक | प्रशिक्षण शुल्क प्रतिपूर्ती रू.३३००/- प्रोत्साहन रक्कम रू.१७००/- |
| | | | ओ लेव्हल कोर्स | एक | प्रशिक्षण शुल्क प्रतिपूर्ती रू. ५०००/- प्रोत्साहन रक्कम रू. १७००/- |
| | | | ए लेव्हल कोर्स | दोन | रू.१०,०००/- |
| २ | सी-डॅक | पुणे युनिव्हर्सिटी कॅम्पस, गणेश खिंड, पाषाण रोड,पुणे ७ दुरध्वनि क्रमांक (०२०) ३५७००७४ दूरध्वनी क्रमांक - (०२०) ५६५ ६६८२,५६५१६८३/८५ फॅक्स क्रमांक - ५६५ ७५५१ ५६७ ९२६४ | डिप्लोमा इन इन्फारमेशन टेक्नॉलॉजी | एक | प्रशिक्षण शुल्क प्रतिपूर्ती रू.३३००/- प्रोत्साहन रक्कम रू.१७००/- |
| | | | ॲडव्हान्स डिप्लोमा इन इन्फारमेशन टेक्नॉलॉजी | दोन | रू. १०,०००/- |
| ३ | यशवंतराव चव्हाण महाराष्ट्र मुक्त विद्यापीठ, नाशिक | ज्ञानगंगोत्री, गंगापूर धरणाजवळ, नाशिक ४२२ ००५, दूरध्वनी क्रमांक - (०२५३) ३५१७१४/१५ ३५४७२७/१८ फॅक्स क्रमांक -३५१७१६ | सर्टीफिकेट इन ऑफीस ऑटोमेशन | एक | प्रशिक्षण शुल्क प्रतिपूर्ती रू.३३००/- प्रोत्साहन रक्कम रू.१७००/ |
| | | | डिप्लोमा इन ऑफीस ऑटोमेशन | दोन | रू.१०,०००/- |
| ४ | सेन्टर फॉर इलेक्ट्रॉनिक्स डिझाईन ॲन्ड टेक्नॉलॉजी ऑफ इंडिया, औरंगाबाद, (सीईडीटीआय) | सीईडीटीआय कॉम्लेक्स विश्वविद्यालय परिसर, औरंगाबाद-४३१ ००४. दूरध्वनी क्रमांक ( ०२४०) ३३२६०९ फॅक्स क्रमांक -३३१७४८ | सर्टीफिकेट इन इन्फॉरमेशन टेक्नॉलॉजी | एक | प्रशिक्षण शुल्क प्रतिपूर्ती रू.३३००/- प्रोत्साहन रक्कम रू.१७००/ |
| ५ | तंत्रशिक्षण परिक्षा मंडळ, महाराष्ट्र राज्य, मुंबई | शासकीय तंत्र निकेतन इमारत, तिसरा मजला, ४९,खेरवाडी, अलीयावर जंग मार्ग, बांद्रे (पूर्व), मुंबई-४०० ०५१. दूरध्वनी क्रमांक (०२२) ६५१३९७९/ ६५१३९८० | ॲडव्हान्स डिप्लोमा इन कॉम्प्युटर सॉफ्टवेअर सीस्टीम ॲनॅलिसीस ॲन्ड ॲप्लीकेशन्स (ओडीसीएसएसए) | एक | प्रशिक्षण शुल्क प्रतिपूर्ती रू.५०००/- प्रोत्साहन रक्कम रू.१७००/ |

एच-922(अ)(3000-12-99)-3अ

(१) मान्यताप्राप्त अभ्यासक्रमात खालील बाबींचा समावेश अनिवार्य आहे.

(अ) Fundumentul of Computers/ DOS & Windows.

(आ) Communication Techniques including use of E-mail, Lotus Notes and Internet.

(इ) Word Processing, Spreadsheet, Presentation Graphics with special emphasis and orientation on Lotus Smart Suite.

(ई) Use of ISM Office/ Leap Office / ISM Publisher.

(उ) Introduction to Database Management Systems.

(ऊ) Introduction to Multimedia and MIS.

(ए) Interduction to I T Applications.

(२) अभ्यासक्रमाचा किमान कालावधी हा १२० तासांचा असेल.

(३) प्रशिक्षण वर्गाची ( Laboratary ) प्रशिक्षणार्थी संख्या २० पेक्षा जास्त नसावी. म्हणजे एका प्रशिक्षकामागे २० पेक्षा जास्त प्रशिक्षणार्थी नसावेत.

(४) प्रत्येक प्रशिक्षणार्थीस मराठी भाषेत Courseware पुरविण्याची जबाबदारी प्रशिक्षण संस्थेची राहील. (ज्यांना इंग्रजी भाषेत Courseware हवे आहे त्यांना ते इंग्रजी भाषेत पुरविण्यांत यावे.)

(५) परिक्षा ही (Objective Type - Multiple choice ) अशा स्वरुपाची असेल. प्रश्न पत्रिकेत १२० पेक्षा जास्त प्रश्न नसतील.

(६) प्रशिक्षण केंद्रात नेटवर्क असेल व वापरात येणाऱ्या आज्ञावल्या हया कायदेशीररित्या प्राप्त करुन घेण्याची जबाबदारी प्रशिक्षण केंद्राची असेल.

(७) प्रशिक्षण देणारे प्रशिक्षक प्रशिक्षण देण्यासाठी पात्र आहेत याबाबत ज्या संस्थांचे अभ्यासक्रम मान्यताप्राप्त आहेत त्या संस्थांनी प्रशिक्षक निहाय प्रमाणित करणे आवश्यक राहील.

-----

मपू-922(अ)(3000-12-99)-4.